**महाराष्ट्र राज्यातील अल्पसंख्याकांकडून चालविण्यात येणाऱ्या शैक्षणिक संस्थांना धार्मिक/ भाषिक अल्पसंख्याक संस्था म्हणून दर्जाची मान्यता देण्यासाठी कार्यपध्दती, अटी व शर्ती विहित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१०/प्र.क्र.५९/१०/कार्या-५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १ एप्रिल, २०१०.

संदर्भः-
१ राष्ट्रीय अल्पसंख्यांक शैक्षणिक संस्था आयोग अधिनियम, २००४.
२ शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. असंस-२००६/६३४/ प्र.क्र.६३/२००६/३५, दिनांक २७ जलै, २००६.
३ शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. असंस-२००६/ ६३४/प्र.क्र.६३/२००६/३५, दि. ११ जन, २००७.
४ शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शाकानि-१००८/प्र.क्र.४/२००८/१८ (रवका), दि.२१ फेब्रवारी,२००८.
५ शासन अधिसूचना, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. असंस-२००८/ प्र.क्र.१४९/०८/का.-१, दि.४ जलै,२००८.
६ शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अशैसं-२००८/ प्र.क्र.१३३/२००८/का.-१, दि.४ जलै,२००८.
७ शासन शुध्दीपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अशैसं-२००९/प्र.क्र.२८/२००९/का.५, दि.१५ मे, २००९.
८ शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अशैसं-२००९/ प्र.क्र.२८/ २००९/का.५, दि.२४.०७.२००९.
९ शासन पूरकपत्र,अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अशैसं-२००९/ प्र.क्र.१४८/ २००९/का.५, दि.२७.१०.२००९.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन क्र.(६) येथील शासन निर्णय,दि.४ जुलै,२००८ अन्वये राज्यातील अल्पसंख्याकांकडून चालविल्या जाणाऱ्या शैक्षणिक संस्थांना धार्मिक /भाषिक अल्पसंख्याक संस्था म्हणून दर्जाची मान्यता प्रदान करण्याबाबतची कार्यपध्दती, अटी व शर्ती विहीत करण्यात आली असून, यामध्ये संदर्भाधीन क्र.(७) ते (९) येथील शासन निर्णयान्वये आवश्यक त्या सुधारणा करण्यात आल्या आहेत. आता अल्पसंख्याक शैक्षणिक संस्थाना दर्जा प्रमाणपत्र प्रदान करण्याची प्रक्रिया अधिक गतिमान व्हावी यासाठी संदर्भाधीन क्र.(७) येथील शुध्दीपत्रकान्वये परिच्छेद ३ (३) मध्ये करण्यात आलेली तरतूद याव्दारे रदद करण्यात येत असून याऐवजी पुढीलप्रमाणे सुधारित तरतूद विहीत करण्यात येत आहेः-

**परिच्छेद ३ (३)-**

**अ)** धार्मिक/भाषिक अल्पसंख्याक शैक्षणिक संस्था म्हणून दर्जाची मान्यता मिळण्यासाठी इच्छुक अल्पसंख्याक संस्थाकडून विहीत नमुन्यातील परिपूर्ण अर्ज सक्षम प्राधिकारी तथा प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग यांच्या नावे प्राप्त झाल्यानंतर, संबंधित संस्थेस रु.५०००/- (रुपये पाच हजार फक्त) किंवा अशी रक्कम जी वेळोवेळी शासनाकडून विहीत केली जाईल एवढया रकमेच्या किमंतीचे ना-परतावा संस्करण शुल्क भरण्याबाबत शासनामार्फत कळविण्यात येईल.

**ब)** सदरहू ना-परतावा संस्करण शुल्क संबंधित संस्थेने **"०२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०० - ८००- इतर जमा रकमा, (०१)-(१४) अल्पसंख्याक शैक्षणिक संस्थाना धार्मिक/ भाषिक अल्पसंख्याक म्हणून दर्जा ना-परतावा संस्करण शुल्क, संगणक संकेताक ०२३५ ०२३-६"** या लेख्यामध्ये शासकिय कोषागारात अथवा भारतीय रिझर्व्ह बॅकेत चलनाव्दारे भरणे आवश्यक राहील.

**क)** ना-परतावा संस्करण शुल्क शासकिय कोषागारात अथवा भारतीय रिझर्व्ह बॅकेत भरल्याचा पुरावा (चलनाची मूळ प्रत) शैक्षणिक संस्थेकडून या विभागास सादर करण्यात आल्यानंतर संबंधित शैक्षणिक संस्थेचा धार्मिक/भाषिक अल्पसंख्याक दर्जाबाबतचा परिपूर्ण अर्ज चलनाची मूळ प्रत विभागास प्राप्त झाल्याच्या दिनांकानुसार/क्रमवारीनुसार सुनावणीसाठी ठेवण्यात येईल.

<u>**परिच्छेद ३ (१०)-**</u>

अल्पसंख्याक शैक्षणिक संस्थाकडून प्राप्त होणा-या दर्जा प्रस्तावावर ९० दिवसाच्या आत सक्षम प्राधिकारी तथा प्र.सचिव (अविवि) यांना निर्णय घेता येणे शक्य व्हावे याकरीता **अल्पसंख्याक शैक्षणिक संस्थाचे दर्जा प्रस्ताव फक्त पुढील कालावधीत स्वीकारण्यात येतील-**

**(क्ष) १ एप्रिल ते ३० जून.**

**(य) १ ऑक्टोंबर ते ३१ डिसेंबर.**

२. प्रस्तुत सुधारित आदेश **दिनांक १५ एप्रिल, २०१० पासून** लागू होतील.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००४०११६२२४९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( टी. एफ. थेक्केकरा )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, नागपूर खंडपीठ, नागपूर
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद
* प्रबंधक, लोक आयुक्त कार्यालय, मुंबई

धर्मादाय आयुक्त, मुंबई / सर्व सहायक धर्मादाय आयुक्त,
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व मंत्रालयीन विभाग
संचालक, उच्च शिक्षण, मुंबई
संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई
संचालक, वैद्यकीय शिक्षण, मुंबई
संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे
शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्चमाध्यमिक),
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी)
निवडनस्ती.

* पत्राने.